**केंद्र पुरस्कृत कृषी उन्नती योजनेंतर्गत कृषी यांत्रिकीकरण उप अभियान सन २०१७-१८ मध्ये राज्यात अनुसूचित जाती/अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी राबविण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः कृयांउ-१०१७/ प्र.क्र.६४/१७/४अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२

तारीख: ०३ ऑगस्ट, २०१७.

**वाचा-**

१) शासन निर्णय क्रमांकः ०३१७/प्र.क्र.१८/राकृवियो कक्ष, दिनांक १३ एप्रिल, २०१७

२) केंद्र शासनाचे पत्र क्र. ३-१/२०१५ M&T (I&P), दि. १ मे, २०१७

३) केंद्र शासनाने उपअभियानासंदर्भात http://farmech.dac.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून दिलेल्या मार्गदर्शक सूचना

४) शासन निर्णय क्रमांकः कृयांउ-१०१७/ प्र.क्र.६४/१७/४अे, दि.२१ जून, २०१७

५) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्रमांक- बीयुडी-२०१७/प्र.क्र.११/कार्यासन-६, दि.२७ जून, २०१७.

**प्रस्तावना-**

सन २०१५-१६ पासून कृषि यांत्रिकीकरण हे उप अभियान कृषी उन्नती योजनेअंतर्गत राबविण्याचे केंद्र शासनाने निश्चित केले आहे. सदर उपअभियानांतर्गत एकूण आठ घटक असून, घटक क्रमांक १ व २ हे नवीन तंत्रज्ञानाने विकसित केलेल्या संयंत्राची प्रात्यक्षिके, प्रशिक्षण व चाचणी बाबत आहेत. सन २०१४-१५ पर्यंत, हे दोन्ही घटक १००% केंद्र पुरस्कृत व उर्वरीत ६ घटकांसाठी केंद्र व राज्य शासनाच्या निधीच्या हिश्श्याचे प्रमाण ७५:२५% असे होते. केंद्र शासनाने सन २०१५-१६ पासून घटक क्र. १ व २ यासाठी केंद्र हिश्श्याचे १००% अनुदानाचे प्रमाण कायम ठेवले असून, उर्वरीत ६ घटकांसाठी केंद्र व राज्य शासनाच्या निधीच्या हिश्श्याचे प्रमाण ६०:४० असे केले आहे. केंद्र शासनाने सदर उपअभियानाच्या मार्गदर्शक सूचना http://farmtech.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून दिलेल्या आहेत. सदर उपअभियान राज्यात राबविण्यासाठी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार संदर्भाधीन अ.क्र. १ येथील दि. ०३ जून, २०१४ च्या शासन निर्णयान्वये विविध समित्यांची स्थापना करण्यात आली आहे.

केंद्र शासनाने, सदर उपअभियान राज्यात सन २०१७-१८ या आर्थिक वर्षामध्ये राबविण्यासाठी संदर्भाधीन अ.क्र.२ येथील दि. १ मे, २०१७ च्या पत्रान्वये महाराष्ट्र राज्यासाठी ₹ ५६८८.०० लक्ष एवढ्या रकमेच्या कार्यक्रमास मान्यता दिलेली आहे व केंद्र हिश्श्याचा ₹ १७०६.४० लक्ष एवढा निधी वितरीत केला आहे. केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार रु.५६८८.०० लक्ष एवढया निधीच्या कार्यक्रमास संदर्भाधीन अ.क्र.४ येथील दि. २१ जून २०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली. केंद्र शासनाने वितरीत केलेल्या निधीमध्ये सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु.१२११.५४ लक्ष, अनुसूचित जाती प्रवर्गसाठी रु.२७३.०२ लक्ष व अनुसूचित जमाती प्रवर्गसाठी रु.२२१.८४ लक्ष एवढया रक्कमेचा समावेश आहे.सर्वसाधारण प्रवर्गासाठीचा निधी संदर्भाधीन अनुक्रमांक.४ येथील दि.२१ जून, २०१७ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. अनुसूचित जाती व अनूसूचित जमातीचा केंद्र हिश्श्याचा निधी रु.४९४.८६ लक्ष व त्याप्रमाणात आवश्यक राज्य हिस्सा रु. ३२९.९० लक्ष असा एकूण रु.८२४.७६ लक्ष एवढा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

१) कृषी यांत्रिकीरण उप अभियानाची सन २०१७-१८ या वर्षात अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी अंमलबजावणी करण्यासाठी केंद्र हिश्श्यापोटी ₹४९४.८६ लक्ष (अक्षरी: रूपये चार कोटी चौऱ्याण्णव लाख शहाऐंशी हजार फक्त) व त्याप्रमाणात आवश्यक राज्य हिस्सा ₹ ३२९.९० लक्ष (अक्षरी: रूपये तीन कोटी एकोणतीस लाख नव्वद हजार फक्त), अशा एकूण ₹ ८२४.७६ लक्ष (अक्षरी रूपये आठ कोटी एकोणसाठ लाख शहात्तर हजार फक्त) निधीच्या कार्यक्रमास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२) सदर निधीचा प्रवर्गानियहाय तपशील खालील प्रमाणे आहे.

| अ.क्र. | प्रवर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|---|
| १. | अनुसूचित जाती | २७३.०२ | १८२.०१ | ४५५.०३ |
| २. | अनुसूचित जमाती | २२१.८४ | १४७.८९ | ३६९.७३ |
| **एकूण** | | **४९४.८६** | **३२९.९०** | **८२४.७६** |

३) सदर खर्च खालील लेखाशिर्षाखालील सन २०१७-१८ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक-डी-३**

२४०१-पीक संवर्धन,

७८९-अनुसूचित जाती उपयोजना

(००)(१३) कृषी उन्नती योजना - कृषी अभियांत्रिकीकरण उप अभियान (कें.पु.यो.)

(केंद्र हिस्सा ६०%) (अनुसूचित जाती उपयोजना)

(२४०१ ए३०५ )- ३३ अर्थसहाय्य

**मागणी क्रमांक-डी-३**

२४०१-पीक संवर्धन,

७८९-अनुसूचित जाती उपयोजना

(००)(१४) कृषी उन्नती योजना - कृषी अभियांत्रिकीकरण उप अभियान (कें.पु.यो.)

(केंद्र हिस्सा ४०%) (अनुसूचित जाती उपयोजना)

(२४०१ ए३१४ )- ३३ अर्थसहाय्य

**मागणी क्रमांक-टी-५**

२४०१-पीक संवर्धन,

पंचवार्षिक योजनांतर्गत योजना,

७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना

(०१) जनजाती क्षेत्र उपयोजना अंतर्गत योजना

(०१)(११) कृषी उन्नती योजना - कृषी अभियांत्रिकीकरण उप अभियान (कें.पु.यो.)

(२४०१ ए४५९ )- ३३ अर्थसहाय्य

(केंद्र हिस्सा ६०%)

**मागणी क्रमांक-टी-५**

२४०१-पीक संवर्धन,

पंचवार्षिक योजनांतर्गत योजना,

७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना

(०१) जनजाती क्षेत्र उपयोजना अंतर्गत योजना

(०१)(१०) कृषी उन्नती योजना - कृषी अभियांत्रिकीकरण उप अभियान (कें.पु.यो.)

(२४०१ ए४४१ )- ३३ अर्थसहाय्य

(राज्य हिस्सा ४०%)

४. सदर निधी खर्च करताना संदर्भाधीन अ.क्र.४ येथील दि. २१ जून, २०१७ च्या शासन निर्णयातील अटी, शर्ती व कार्यपद्धतीचे पालन करण्यात यावे.

५. सदर निधी सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात खर्च होईल, याची दक्षता घ्यावी.

६. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाच्या संदर्भाधीन अनुक्रमांक. ५ येथील शासन निर्णयास अनुसरुन तसेच सामाजिक न्याय विभागाच्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/ अर्थ-३, दिनांक १८ एप्रिल, २०१७ च्या शासन परिपत्रकातील अटींच्या पालनेच्या अधीन राहून व वित्त विभागाचे परीपत्रक अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दिनांक ३० जून, २०१७ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०३१७२४५१७००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2017.08.03 17:16:14 +05'30'

**( सु.सं.धपाटे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. कुलगुरू, कृषी विद्यापीठे (सर्व )
३. संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषि आयुक्तालय,पुणे
४. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. सर्व संचालक / सहसंचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
६. व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ दिनकरराव देसाई मार्ग, गोरेगाव (पूर्व ) मुंबई- ६५
७. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
८. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
९. सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
१०. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबईनागपूर/ (लेखा परिक्षा( /(लेखा व अनुज्ञेयता)
११. महालेखाकार (स्थानिय) निकाय लेखापरिक्षा व लेखा प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०००२०
१२.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१३.नियोजन विभाग (का-१४३१) /मंत्रालय, मुंबई-३२
१४. वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३ ) / मंत्रालय, मुंबई-३२
१५.मा. राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
१६.मा. मंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
१७. निवड नस्ती (कार्यासन -४अे).